महाराष्ट्र - कर्नाटक सीमा प्रश्न आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्ती वेतन व इतर आर्थिक लाभ.....
वित्तीय वर्ष २०१५-२०१६ मधील जून, २०१५ ते नोव्हेंबर, २०१५ या कालावधीकरीता अनुदानाचे वाटप.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : बियुडी-१८१५/प्र.क्र.६०/२०१५/३६**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १० जून, २०१५

संदर्भ :-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.मकसी-१०१०/प्र.क्र.९१/२०१०/३६, दि.२९/०३/२०११.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.बियुडी-१८१४/प्र.क्र.९६/२०१४/३६, दि.२१/०४/२०१५.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.बीयुडी-२०१५/प्र.क्र.७९/२०१५/२५, दि.०८/०४/२०१५.
४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.बीयुडी-१८१५/प्र.क्र.६०/२०१५/३६, दि.२७/०४/२०१५.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/०४/२०१५.

**शासन परिपत्रक :-**

"**मागणी** क्र.ए-५, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम - १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्ती वेतन - (००) (०३) महाराष्ट्र कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांचे वारसांना निवृत्ती वेतन (२२३५ २४९३)" या लेखाशीर्षाअंतर्गत सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षासाठी **एकूण रु.२०,६३,०००/- (रुपये वीस लक्ष त्रेसष्ट हजार फक्त)** एवढी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. त्यापैकी माहे एप्रिल व मे, २०१५ या २ महिन्यांचा खर्च भागविण्याकरीता **रु.३,४२,०००/- (रुपये तीन लक्ष बेचाळीस हजार फक्त)** इतके लेखानुदान महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना सुधारित दराने निवृत्तीवेतन व अन्य लाभ

अदा करण्यासाठी दि.२७/०४/२०१५ च्या परिपत्रकान्वये पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे वितरित करण्यात आलेले आहे :-

| अ. क्र. | जिल्हाधिकारी (लाभार्थ्यांची संख्या) | सन २०१५-१६ एकूण अर्थसंकल्पीय अनुदान (रुपये) | एप्रिल व मे,२०१५ या कालावधीसाठी वितरित केलेला निधी | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | निवृत्तीवेतन ( दरमहा रु.१०,०००/- प्रत्येकी प्रमाणे) प्रत्येक महिन्यासाठी वितरीत केलेले अनुदान (रुपये) | निवृत्तीवेतन एप्रिल व मे, २०१५ साठी एकूण वितरीत अनुदान (रुपये) | प्रवासभत्ता (प्रत्येकी रु.५००/- वार्षिक प्रमाणे) (मे, २०१५ मध्ये उपलब्ध) (रुपये) | इतर आर्थिक लाभ (प्रत्येकी रु.५०००/- वार्षिक प्रमाणे) (मे, २०१५ मध्ये उपलब्ध) (रुपये) | एकूण वितरीत अनुदान (रुपये) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | मुंबई शहर (३) | -- | ३०,००० | ६०,००० | १,५०० | १५,००० | ७६,५०० |
| २ | कोल्हापूर (९) | -- | ९०,००० | १,८०,००० | ४,५०० | ३०,००० | २,१४,५०० |
| ३ | पुणे (१) | -- | १०,००० | २०,००० | ५०० | ५,००० | २५,५०० |
| ४ | रत्नागिरी (१) | -- | १०,००० | २०,००० | ५०० | ५,००० | २५,५०० |
| **एकूण अनुदान** | | **२०,६३,०००** | **१,४०,०००** | **२,८०,०००** | **७,०००** | **५५,०००** | **३,४२,०००** |

**२.** वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १७/४/२०१५ च्या परिपत्रकान्वये, महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१५ (महाराष्ट्र-विनियोजन लेखानुदान अधिनियम,२०१५ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ-४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यांस विधानमंडळाने मंजुरी दिलेली असून ते सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १४ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दि.०९/०४/२०१५ मध्ये प्रसिध्द केल्याचे निदर्शनास आणण्यात आले आहे. तसेच सन २०१५-१६ या वित्तीय वर्षातील प्रथम आठमाहीकरीता (नोव्हेंबर, २०१५ अखेर) आवश्यक असणारा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ७०% च्या मर्यादेत वितरीत केल्याचे स्पष्ट करण्यात आले आहे.

**३.** वित्त विभागाच्या दि.१७/४/२०१५ च्या परिपत्रकातील तरतुदी विचारात घेता एकूणअर्थसंकल्पीय तरतुदीच्या **७०%** म्हणजेच एकूण रु.१४,४४,१००/- एवढी तरतूद दि.०१ एप्रिल, २०१५ ते दि.३० नोव्हेंबर,२०१५ या कालावधीत वितरीत करण्यासाठी उपलब्ध असून त्यापैकी वरीलप्रमाणे रु.३,४२,०००/- ची रक्कम यापूर्वीच वितरीत करण्यात आलेली आहे. सबब, आता दि.०१ जून, २०१५ ते दि.३० नोव्हेंबर, २०१५ या ६ महिन्यांच्या कालावधीसाठी सुधारित निवृत्तीवेतन व ऑक्टोबर, २०१४ ते

मार्च, २०१५ या कालावधीतील निवृत्तीवेतन फरकाची रक्कम अदा करण्यासाठी **रु.१०,३१,०००/- (रुपये दहा लक्ष एकतीस हजार फक्त)** ची रक्कम संबंधित जिल्हाधिकारी यांना पुढीलप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हाधिकारी (लाभार्थ्यांची संख्या) | सन २०१५-१६ एकूण अर्थसंकल्पीय अनुदान (रुपये) | ०१ जून, २०१५ ते ३० नोव्हेंबर ,२०१५ या कालावधीसाठी वितरित केलेला निधी | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | निवृत्तीवेतन ( दरमहा रु.१००००/- प्रत्येकी प्रमाणे) प्रत्येक महिन्यासाठी वितरीत केलेले अनुदान (रुपये) | निवृत्तीवेतन ०१ जून,२०१५ ते ३०नोव्हेंबर,२०१५ साठी एकूण वितरीत अनुदान (रुपये) | इतर आर्थिक लाभ (प्रत्येकी रु.५०००/- वार्षिक प्रमाणे) (जुलै, २०१५ मध्ये उपलब्ध) (रुपये) | ऑक्टोबर,२०१४ ते मार्च ,२०१५ या कालावधीतील निवृत्तीवेतन फरकाची रक्कम (जुलै, २०१५ मध्ये उपलब्ध) (रुपये) | एकूण वितरीत अनुदान (रुपये) (५+६+७) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | मुंबई शहर (३) | -- | ३०,००० | १,८०,००० | -- | ३६,००० | २,१६,००० |
| २ | कोल्हापूर (९) | -- | ९०,००० | ५,४०,००० | १५,००० | १,१६,००० | ६,७१,००० |
| ३ | पुणे (१) | -- | १०,००० | ६०,००० | -- | १२,००० | ७२,००० |
| ४ | रत्नागिरी (१) | -- | १०,००० | ६०,००० | -- | १२,००० | ७२,००० |
| | **एकूण अनुदान** | **२०,६३,०००** | **१,४०,०००** | **८,४०,०००** | **१५,०००** | **१,७६,०००** | **१०,३१,०००** |

४. येथे नमूद करण्यात येते की, संदर्भाधीन दि.२१/०४/२०१५ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना स्वातंत्र्य सैनिकांप्रमाणेच रु.१०,०००/- दरमहा एवढे वाढीव निवृत्तीवेतन दि.०२/१०/२०१४ पासून लागू करण्यात आले आहे. त्यामुळे दरमहा रु.२०००/- प्रत्येकी प्रमाणे, ऑक्टोबर,२०१४ ते मार्च, २०१५ या कालावधीतील देय होणारी निवृत्तीवेतन फरकाची रक्कम लाभार्थ्यांना अदा करण्यासाठी तक्त्यातील रकाना ७ प्रमाणे मंजूर करण्यात आलीआहे. **कोल्हापूर येथील एक लाभार्थी श्रीमती सुशिला लक्ष्मण पाटील यांचे दि.२७/०१/२०१५ रोजी निधन झाले**

**असल्यामुळे फेब्रुवारी / मार्च, २०१५ या कालावधीची थकबाकी त्यांना अनुज्ञेय करण्यात आलेली नाही. कृपया या बाबीची संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाने नोंद घ्यावी.**

**५. वर परिच्छेद ३ मधील तक्त्यानुसार मंजूर करण्यात आलेले अनुदान पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे:-**

१) **०१ जून, २०१५ ते ३० नोव्हेंबर, २०१५** या ६ महिन्यांचा खर्च संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांना वितरीत केलेल्या तरतूदी इतका मर्यादित ठेवावा.

२) संबंधित जिल्हाधिकारी यांनी उक्त बाबीवर होणाऱ्या खर्चाची वेगळी नोंद ठेवून महालेखापाल कार्यालयामधील खर्चाच्या नोंदीशी दरमहा ताळमेळ घालून त्याचे विवरणपत्र सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५ व वित्त विभाग यांच्याकडे विहित मुदतीत पाठवावे व त्याची प्रत या कार्यासनास देखिल पाठवावी. कुठल्याही परिस्थितीत २२३५२४९३ या लेखाशीर्षाखालीच रकमा खर्ची पडत असल्याची व त्याबाबत खर्चमेळाद्वारे खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील, याची कृपया नोंद घ्यावी.

६. हे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र८५/अर्थ-३, दि.१७/०४/२०१५ मधील सूचना विचारात घेऊन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१०१६४७२०६००७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Riyajuddin Ibrahim Shaikh

Digitally signed by Riyajuddin Ibrahim Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Riyajuddin Ibrahim Shaikh
Date: 2015.06.10 16:49:10 +05'30'

**( रि.इ.शेख )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी रवाना :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र- १, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र- १, मुंबई.
३. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा), मुंबई.
४. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव, लेखा व कोषागरे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, जुने जकात गृह, फोर्ट, मुंबई-२३.

७. जिल्हाधिकारी, कोल्हापूर.

८. जिल्हाधिकारी, पुणे.

९. जिल्हाधिकारी, रत्नागिरी.

१०. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१ यांना असे कळविण्यात येते की, त्यांना आवश्यक असलेले अनुदान जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्याकडून मागविण्यात यावे.

११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

१३. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.

१४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

१५. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.

१६. सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५, मंत्रालय, मुंबई.

१७. निवड नस्ती (कार्या.३६).